महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीम
दिनांक:-२ ऑक्टोबर,२०१० रोजी
मोहीमेची जाहीरात वृत्तपत्रामधून प्रसिध्द
करण्याच्या खर्चास मंजूरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक तंमुगा-१०१०/प्र.क्र. १०४/२०१०/पोल-१५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक:- ७ मार्च, २०११

**वाचा :-** १) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक तंमुगा-१००८/प्र.क्र. ४३/२००८/पोल-१५, दि. १४ ऑगस्ट, २००८

२) शासन निर्णय गृह विभाग क्रमांक तंमुगा-१०१०/प्र.क्र. १०४/२०१०/पोल-१५, दि. ३० डिसेंबर, २०१०

**शासन निर्णय :-** संदर्भीत क्रमांक (१) येथील आदेशातील तरतूदीनुसार महात्मा गांधी तंटामुक्त गाव मोहीमेची जाहीरात विविध दृकश्राव्य माध्यमे तसेच प्रिंट माध्यमांव्दारे प्रसारीत करण्यात येत आहे. दि. २ ऑक्टोबर, २०१० रोजी महात्मा गांधी यांच्या जयंतीचे औचित्य साधून मोहीमेच्या अंमलबजावणीची जाहिरात राज्यातील सर्व 'ब' व 'क' वर्गवारीतील वृत्तपत्रामधून प्रसारीत करण्यात आली होती. सदर जाहीरात प्रसारणाची ३१६ वृत्तपत्रांची देयके संदर्भात नमूद (२) येथील आदेशान्व्ये मंजूर करण्यात आली आहेत.

०२. दि. २/१०/२०१० रोजी जाहीरात प्रसारीत केल्यासंबंधीची राज्यातील 'ब' व 'क' वर्गवारीतील आणखी ५५ वृत्तपत्राची देयके या विभागास प्राप्त झाली आहेत. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने सदर देयके प्रमाणित केलेली आहेत. या देयकाचे विवरणपत्र सोबत जोडले आहे. या ५५ देयकांसाठी एकूण रु. २,०४,८००/- (रुपये दोन लाख चार हजार आठशे फक्त) इतका खर्च येत असून त्यास या आदेशान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

क्रमांश

०३. प्रमाणित करण्यात येते की, सदरचा खर्च मोहीमेची जाहीरात, प्रसिध्दी व प्रचार यावर करण्यात आला असून यापूर्वी त्याची अदायगी करण्यात आलेली नाही. सदरचा खर्च विहित पध्दतीचा अवलंब करुन केलेला आहे.

०४. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई हे वृत्तपत्रांच्या देयकाच्या रुपये २,०४,८००/- (रुपये दोन लाख चार हजार आठशे फक्त) इतक्या खर्चाच्या रकमेइतक्या तरतुदीचे जिल्हानिहाय वितरण करतील आणि संबंधित जिल्हा पोलीस अधीक्षक जिल्ह्यातील वृत्तपत्रांच्या देयकांच्या रकमेचे धनादेश तयार करुन त्याचे वितरण करतील.

०५. यावर होणारा खर्च रु. २,०४,८००/- (रुपये दोन लाख चार हजार आठशे फक्त) गृह विभाग मागणी क्र. बी-१, प्रधान लेखाशिर्ष २०५५ पोलीस (००) (१०) तंटामुक्त गाव मोहीम (२०५५०५३३) २६ जाहीरात व प्रसिध्दी या खालील सन २०१०-११ या वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०६. सदरचा शासन निर्णय राज्यशासनाच्या वेबसाईटवर टाकण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०३०८१३५८५६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व स्वाक्षरीने.

**(वि. फ. वसावे)**
कार्यासन अधिकारी, गृहविभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
महालेखापाल १ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग (कार्यासन व्यय-७/अर्थ-२ व अर्थ-११), मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
निवडनस्ती, पोल-१५